उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळाच्या कार्यक्षेतील जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी, गट-अ च्या एकूण ६१ अस्थाई पदांना मुदतवाढ.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.१२४/आरोग्य-४

मंत्रालय,१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,मुंबई-४०० ०३२
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: २२ जुन, २०१५.

वाचा

**१) शासन निर्णय, सा.आ.वि.,क्रमांकः पदआ-२००७/प्र.क्र.११७/सेवा-१, दि.६.०८.२००७.**
**२) शासन निर्णय, सा.आ.वि. क्र. अस्थाई-२०११/प्र.क्र.११५/आरोग्य-४, दि.२०.०५.२०११.**
**३) शासन निर्णय, सा.आ.वि.,क्र. अपदे-२०१४/प्र.क्र.१०६/आरोग्य-४, दि.१६.०५.२०१४.**
**४) सहसंचालक, आरोग्य सेवा,प्रा.आ.कें. (जिपस्तर), मुंबई यांचे पत्र,क्र. संआसे/कक्ष ७-अ/टे-५/ अस्थाई पदे/ वै.अ./२०१५/२००९-११, दि.१५.०५.२०१५.**

शासन निर्णय

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळातील २७६ अस्थाई पदांपैकी ८० टक्के पदांच्या स्थायीकरणास उपरोक्त क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. अर्वरीत अस्थाई पदांपैकी औरंगाबाद मंडळातील जिल्हा परिषदांकडील प्राथमिक आरोग्य केंद्रांतील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या ६१ अस्थाई पदांचा विभागाच्या आकृतीबंधात समावेश झालेला आहे. या ६१ अस्थाई पदांना संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये दिनांक १.०३.२०१४ ते दिनांक २८.०२.२०१५ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे. सदर उपसंचालक, आरोग्य सेवा,औरंगाबाद मंडळाच्या कार्यकक्षेतील जिल्हा परिषद प्राथमिक आरोग्य केंद्रातील वैद्यकीय अधिकारी, गट-अ ची सोबतच्या विवरणपत्रातील एकूण ६१ अस्थाई पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नव्हती वा अतिरिक्त कार्यभार दिलेला नाही, या अटींच्या अधीन राहून दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे किंवा तद् अनुषंगिक बाबींची त्रुटी आढळून आल्यास त्यांची संपूर्णत: जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक-१ मधील मुख्य लेखाशीर्ष " २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६- सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन,

(०१) (०४)-गट वैद्यकीय अधिकारी (२२१० ०३७१) " करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ ) (२००४ )/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१७३९३५८६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.06.23 12:55:05 +05'30'

**( अ. ता.उईके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, प्रा.आ.केंद्र (जि.प.स्तर ), मुंबई.
३. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, औरंगाबाद,जालना, हिंगोली, परभणी.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,जालना, हिंगोली, परभणी.
९. जिल्हा आरोग्य अधिकारी, औरंगाबाद,जालना, हिंगोली, परभणी.
१०. वित्त विभाग ( व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३ / अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
१२. निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).